# अनारकोचा चौथा दिवस

हिंदी - सत्यु

मराठी अनुवाद - मानसी महाजन

अनारको सकाळी झोपेतून उठली तेव्हा तिला धाप लागली होती. रात्री स्वप्नात खूप पाऊस पडला होता. अनारकोने आठवून पहिले तेव्हा तिला जाणवले, की आज स्वप्नात जेवढा पाऊस पडला होता, तेवढा पाऊस या आधी स्वप्नात कधीच पडला नव्हता. कधीच नाही. स्वप्नात खच्चून पाऊस पडला होता आणि अनारको त्यात खच्चून भिजली होती. खूप नाचली होती, बागडली होती, इकडे तिकडे पाणी उडवत चिक्क भिजली होती. पावसाचं पाणी डोक्यावर पडत होतं, मग केसांमधून सरसर करत डोळ्यांवरून ओघळत गालाच्या कडेनी ओठांजवळ आलं की खालचा ओठ वाकडा करून ती ते पिऊन टाकत होती - सुर्र्क. आणि मग इकडून तिकडे तिकडून इकडे नुसती धावत सुटली होती. म्हणून तिला धाप लागली होती. धाप कमी होईपर्यंत अनारकोला पुन्हा झोप लागली आणि ती स्वप्न बघू लागली. दमली तर होतीच, त्यामुळे तिला स्वप्नात समोर खुर्ची दिसली आणि ती त्यात पसरली.

स्वप्न होतं, सत्य नाही, पण त्याने काय बिघडलं? अनारको स्वप्नातल्या खुर्चीत हात पाय पसरून ऐसपैस बसली आणि तशीच झोपून गेली. झोपता झोपता तिला अजून एक स्वप्न पडलं. हे स्वप्नातलं स्वप्न होतं. त्यामुळे अनारको ते खूप लक्षपूर्वक बघू लागली. खुर्चीच्या दोन्ही हातांना अचानक लांब लांब पंख फुटले. लांबलचक, शुभ्र, हलकी निळाई पांघरलेले पंख. खुर्ची हळू हळू वर उडू लागली, आणि त्याबरोबर खुर्चीत बसलेली अनारकोही. एकदम हलकं हलकं वाटत होतं तिला, जणू शरीरातून हलकं हलकं रक्त वाहत असावं. अनारकोला आज प्रथमच काटेसावरीचा कापूस होणं म्हणजे काय हे समजलं. अनारकोने खाली पाहिलं. घरं, झाडं, मैदान, शाळा.... सगळं छोटे छोटे होत चाललं होतं. धूसर होत चाललं होतं. मग ती अजून वर जाऊ लागली. समोर एक लठ्ठसा ढग आला आणि अनारको खुर्चीसकट त्या ढगात घुसली. हलका हलका ढग आणि त्यातून उडणारी हलकी हलकी अनारको. थोड्या वेळात ढगही छोटे छोटे झाले आणि रुईच्या कापसासारखे दिसू लागले. इकडे खुर्ची तर उडतच होती - आरामात, पंख हलवत, जणू नाचत होती. अनारको थोडीशी घाबरली आणि डोळे मिटून झोपून गेली. तेवढ्यात खुर्ची जमिनीवर उतरली आणि अनारको पाहते तर ती एका वेगळ्याच विचित्र जागेवर पोहोचली होती.

सगळीकडे पाहता दिसले की सगळीकडे झाडे आहेत आणि जवळ एक नदीसुद्धा वाहते आहे. ही झाडे तर अगदीच विचित्र होती. त्यांची खोडे तर जमिनीच्या वर होती, जशी झाडांची एरवी असतात, पण खोडांवर फांद्या आणि पानांच्या ऐवजी मुळं उगवली होती! मोठी झाडं, छोटी झाडं - पण सगळी अशीच विचित्र. आकाशातून पाहता त्यांची मुळं अशी दिसत होती जणू जोराच्या वाऱ्यात झाडांचे जाडे भरडे केस उडत असावेत. "यांची पानं कुठे बरं असतील?" अनारको विचार करू लागली. ती नदीजवळच्या एका झाडाखाली गेली आणि जमिनीला कान लावून ऐकू लागली. तिला अगदी स्पष्ट ऐकू आलं, जमिनीखालून चक्क कोंब फुटल्याचे आवाज येत होते, थांबत थांबत. मान वर करून बघते तर काय! नदीचं पाणी खालून वर वाहत होतं! एवढं पाणी खालून वर वाहत कुठे जात असावं असा विचार करत असताना तिला पाण्यात तिचं प्रतिबिंब दिसलं. तिचं प्रतिबिंब छान हसत होतं आणि एकदम आनंदात दिसत होतं. प्रतिबिंबाप्रमाणे

अनारकोही आनंदी दिसू लागली. नदीच्या किनाऱ्यावर झाडाच्या खाली "गोल गोल राणी किती भरलं पाणी" खेळू लागली. हलका पाऊस पडत असल्यामुळे तिला खूपच मजा येऊ लागली.

एवढ्यात जवळ काही हालचाल झाली. झाडांच्या मधोमध एका जागेवर आकाशातून उजेडाचा एक झोत पडला आणि त्याचं एक गोल रिंगण तयार झालं. त्या रिंगणात एक छोटंसं वादळ सुरु झालं आणि खूप धूळ उडू लागली. थोड्या वेळात वादळ शांत झालं आणि त्या जागेवर एक झोपलेला म्हातारा माणूस दिसू लागला. आजूबाजूला अनेक ठिकाणी अशीच वादळं उठू लागली. वादळ शांत झाल्यावर तिथे म्हातारी माणसं दिसू लागली. कुठे एखादी झोपलेली म्हातारी दिसू लागली. अनारको हे सगळं अगदी आश्चर्याने पाहत होती तेवढ्यात तिच्या समोर गाडीच्या आकाराचं काहीतरी येऊन उभं राहिलं. अनारकोच्या समोर त्या गाडीचं दार उघडलं आणि आपल्याला गाडीत बोलावलं जात आहे हे अनारकोला समजलं. ती जाऊन आत बसली. जरा ऐसपैस बसतच होती तेवढ्यात गाडी सुरु झाली. गाडीच्या खिडकीतून ती म्हातारी माणसं अजूनही दिसत होती. गाडी शेजारून ती सुद्धा पुढे पुढे चालत असावीत, किंवा उडत असावीत असं वाटत होतं. रस्त्याच्या कडेला मैलाचे दगड होते आणि त्यांना एकामागून एक पटापट मागे टाकत गाडी पुढे धावत होती. नीट निरखून पहिले असता तिला समजले की ते मैलाचे दगड नव्हतेच, त्यांच्यावर वर्षे लिहिलेली होती. एका दगडावर अमुक अमुक वर्ष, मग पुढच्यावर तमुक वर्ष आणि असंच सर्व दगडांवर लिहिलेलं होतं. अनारकोने जाणलं, ही गाडी अंतर कापत नसून वर्ष मागे टाकते आहे! खिडकीतून ती पहात होती, बाहेर म्हातारी माणसे एकमेकांवर वसावसा ओरडत होती, जोरजोरात भांडत होती. कोणी कोपऱ्यात एकटेच उदास बसले आहेत, तर कोणी हातवारे करत दुसऱ्यांवर ओरडत आहेत. कोणीही हसत नाही, कोणीही आनंदी नाही - रडत सुद्धा नाही. ही म्हातारी माणसे कमजोर होती त्यामुळे फार भांडू शकत नव्हती, दमून जात होती. अनारको मनाशी म्हणाली, चला हे बरं झालं - यांच्या अंगात शक्ती असती तर यांनी भांडून भांडून सगळीकडे सत्यानाश केला असता.

या विचाराने थोडं हायसं वाटत असतानाच अनारकोला समोर सत्यानाश दिसलाच. गाडी एव्हाना बरीच पुढे गेली होती, आणि अनारकोला बाहेर आता थोडी तरुण माणसे दिसू लागली. म्हणजे अशी आई बाबांच्या वयाची माणसे. आई असती तर नक्की म्हणाली असती, “अन्नो, हे सगळे काका-काकू आहेत, चल नमस्कार कर त्यांना.” अनारकोचं उभं आयुष्य या अश्या काका-काकूंना नमस्कार करण्यात गेलं होतं, त्यामुळे जरा वैतागूनच ती खिडकीबाहेर पाहू लागली. तसं पाहिलं तर वैतागण्यासारखं बाहेर बरंच काही घडत होतं, वैतागण्यासारखंही आणि इतरही बरंच काही. बाहेर सगळी माणसं इतकी वाईट, घाणेरडी कामं करत होती - काही विचारू नका. एका बाजूला काही माणसं दुसऱ्या बाजूच्या लोकांवर बॉम्ब टाकत होती. तिथून सारखे रडण्याचे आवाज येत होते. ते रडण्याचे आवाज ऐकू आले तरीही इकडे लोक नवीन बॉम्ब तयार करतच होते. बॉम्ब टाकणं सोपं जावं म्हणून खास विमानं सुद्धा तयार करत होते. काही लोक बॉम्ब कसे तयार करावेत यावर बोलत होते, तर काही बॉम्ब का तयार केले पाहिजेत हे सांगत होते. बरं, सगळी माणसं सज्जन दिसत होती, चांगली वाटत होती. एकाचा चेहेरा तर 'बंदर छाप मंजन' च्या कॅलेंडर वरच्या वनवासी रामासारखा होता - एकदम सज्जन. चांगले लोक, चांगले चुंगले कपडे घातलेले. अनारकोने पाहिले, तर ज्यांचे कपडे अधिक चांगले, ते लोक अधिक वाईट वागत होते. हे सगळं पाहून अनारकोला कसंतरीच वाटू लागलं. तिला काय वाटतंय तेच तिला समजेनासं झालं. पण कसं-कसं वाटतंच होतं, खूप कसं-कसं. तिने मान वर करून दूर नजर टाकली तर तिथे अनेक लोक जमा झालेले दिसले. विटके, फाटके कपडे घातलेले लोक. खरं तर या बॉम्ब टाकणाऱ्या लोकांनी सगळीकडे बॉम्ब टाकताना, धावपळ करताना इतकी धूळ उडवली होती की चहूबाजूला धूसर दिसू लागलं होतं.

ते कोण लोक जमा झाले आहेत हे त्यामुळे नीट दिसत नव्हतं. दोन्ही हात डोळ्याशेजारी लावून, खिडकीला खेटून बाहेर पहिले असता तिला ते कोण लोक आहेत हे दिसले.

हे असे लोक अनारकोने अनेकदा पहिले होते. हे त्या लोकांसारखेच होते - जे उन्हाळ्यात भर दुपारी कुठूनतरी येऊन कुठेतरी जात असताना तिच्या घराबाहेर सावलीला बसत, आणि पाणी मागत. त्यांना पेल्यातून पाणी दिले तर हातांची ओंजळ ओठांजवळ नेऊन म्हणत "दे बाळा". पेल्याला कधीच शिवत नसत. अनारकोने पहिले, बरेचसे तसेच लोक वेगवेगळी कामे करत होते. कोणी घर बांधत होते, कोणी विहीर खणत होते, कोणी कपडे शिवत होते, कोणी कोळसा वागवून नेत होते. पण ही सगळी कामे करता करता त्यांच्यापैकी काही लोक वाईट कामे सुद्धा करत होते. कुठे कोणी पुरुष एका बाईला मारत होता, कुठे दोन बायका आपापसात भांडत होत्या. "यांची डोकी फिरली आहेत का?" अनारकोला प्रश्न पडला. मग तिला आठवली गोम! आपण झोपेत असताना ती कानावाटे डोक्यात घुसते आणि मेंदू खाऊन टाकते. अनारकोला वाटले, "या सर्वांच्या मेंदूत गोम तर नाही घुसली झोपेत?" पण एवढ्या लोकांच्या मेंदूत एकाच वेळी कशी घुसेल गोम? पण काहीतरी मेख आहे. हे सगळे विचार अनारकोच्या मनात चालू होते, आणि अजूनही तिला कसं-कसं होतंच होतं. त्यामुळे तिला विचार करायला खूप वेळ लागत होता. तेवढ्यात गाडी बरीच पुढे गेली. आता अनारकोला खडकीबाहेर तिच्यासारखी माणसे दिसू लागली. तिच्यासारखी, किंकू, गोलू सारखी. कोणी काळे, कोणी गोरे. कोणाचे डोळे गोल, तर कोणाचे चपटे. कोणी जाड, कोणी बारीक. पण सगळे तिच्यासारखेच. कोणी इकडे तिकडे धावत होते, कोणी समोरून येणाऱ्या मुंग्या एकमेकींना कसा पाय उचलून नमस्ते करतात हे पाहण्यात गुंग होते. कोणी झाडावरच्या कैऱ्या पाडत होते, तर कोणी पडल्या पडल्या स्वप्न पाहत होते.

अनारकोने छातीवर हात ठेवला आणि तिला जाणवले की आता श्वास घेणं सोपं झालं आहे. काही माणसे भांडाभांडी सुद्धा करत होती. पण ते भांडण म्हणजे बदलीतलं पाणी एकमेकांवर उडवल्यासारखं भांडण होतं. बदलीतलं पाणी संपलं की भांडणही संपलं. अगदीच खूप राग आला असेल तर एक दोनदा दुसऱ्यावर पायाने पाणी उडवावं, बास. आता आनारको खिडकीशी अगदी खेटून बसली आणि बाहेर पाहू लागली. इतकी खेटून बसली की पलीकडून कोणी पाहिलं असतं तर त्यांना तिचं नाक एकदम चपटं दिसलं असतं. मग तिला अजून लहान लहान माणसं दिसली. काही तर मुक्ती चालायला शिकली होती, लुटुलुटू चालत होती. सूर्याचा एक छोटासा कवडसा सारखा बोटावर येत असल्यामुळे काही माणसे हसून हसून लोळत होती. कोणी पोटावर झोपून डोकं हातावर ठेऊन गहन विचार करत होती. सगळे एकमेकांना मिठ्या मारत होते, एकमेकांच्या केसावरुन हात फिरवत होते, एकमेकांना गोंजारत होते. काही लोक तर बसल्या बसल्या भोकाड पसरून रडत होते. अनारकोला वाटले, या रडणाऱ्यांनी बहुदा आधीच्या लोकांना एकमेकांवर बॉम्ब टाकताना पाहिले असावे, मरण्याचे, रडण्याचे आवाज ऐकले असावेत, म्हणून यांनी भोकाड पसरला असावा. एवढयात गाडी पुढे गेली आणि आता बाहेरची माणसं अगदीच इटुकली पिटुकली झाली. सगळी एकसारखीच दिसत होती. इतकी एकसारखी दिसत होती की अनारकोला कोणा एकाकडे एकटक बघणं सुद्धा अवघड होत होतं. इथे तर बरेचसे लोक रडत होते! असे काही केविलवाणे रडत होते, जणू काही दुखतंय, खुपतंय, सांगायचंय पण सांगू शकत नाहीत. त्यांचं दुःख आपल्याला थोडं थोडं समजतंय असं अनारकोला वाटलं.

आता पुढे कोणते लोक दिसतील असा विचार करत असतानाच ती अचानक एका खोल खड्ड्यात पडली. खड्डा इतका खोल आणि अंधारा होता - विचारूच नका! अनारको बराच वेळ पडत होती, तिला भीती वाटू लागली. डोळे बंद

करायचा प्रयत्न करताच तिचे डोळे खाड्कन उघडले. ती दचकून उठली. तिला खूप कसंतरी वाटू लागलं. अनारको ताबडतोब पलंगावरून उठली आणि अंघोळीला गेली.